जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत राबवावयाच्या शासकीय महाविद्यालयांचा विकास या जिल्हास्तरीय योजनेबाबतच्या मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१५/(३२०/१५)/मशि-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ००३२.
दिनांक : २९ डिसेंबर, २०१६.

वाचा -

१) नियोजन विभाग शासन निर्णय क्र. जिल्हा वार्षिक योजना २००७/ प्र. क्र. ३९/ का.१४१४, दि. १६ फेब्रुवारी, २००८.
२) नियोजन विभाग शासन परिपत्रक क्र. डिएपी १०१५ / प्र.क्र. १४८/ का.१४८१, दि. १३ ऑगस्ट, २०१५.
३) उद्योग, उर्जा, व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.भखस २०१४/ प्र. क्र. ८२ / भाग -३ उद्योग -४, दि. ३० ऑक्टोबर, २०१५.
४) नियोजन विभाग शासन परिपत्रक क्र. डिएपी-१०१६ / प्र.क्र.४७ / का.१४८१, दि. १९ मार्च, २०१६.

प्रस्तावना -

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत सात शासकीय कला महाविद्यालये, तीन शासकीय विज्ञान संस्था, सहा शासकीय प्रशासकीय सेवापूर्व प्रशिक्षण संस्था, तीन न्यायसहायक विज्ञान संस्था, बारा अध्यापक महाविद्यालये, दोन शासकीय वाणिज्य महाविद्यालये कार्यरत आहेत. या शासकीय संस्था / महाविद्यालयांमधून पदवी व पदव्यूत्तर अभ्यासक्रम राबविले जातात. तसेच या संस्थामध्ये विविध विषयांचे संशोधन विभाग असून यामधून विद्यार्थ्यांना विविध विषयावर संशोधन करण्याची सुविधा उपलब्ध होते. न्याय वैदक शास्त्रामध्ये कुशल मुनष्यबळ न्यायसहाय्यक विज्ञान संस्थामधून निर्माण होत आहे. या संस्था व महाविद्यालयामधील बांधकामे तसेच प्रयोगशाळा उपकरणे व साधनसामुग्री खरेदी व इतर आधुनिकीकरणाची कामे जिल्हास्तरीय योजनांतर्गत योजनेतून करण्यात येतात. या योजनांसाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत येत असलेल्या शासकीय संस्था / महाविद्यालये यामधील बांधकामे तसेच प्रयोगशाळा उपकरणे व साधनसामुग्री खरेदी तसेच आधुनिकीकरणाची कामे करण्यासाठी सन २००८-०९ पासून जिल्हा नियोजन समिती कडून जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण योजना) अंतर्गत "शासकीय महाविद्यालयांचा विकास" या जिल्हास्तरीय योजनेतून निधी उपलब्ध करुन दिला जातो. सदरचा निधी लेखाशीर्ष २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०३ विद्यापीठ व उच्च शिक्षण, १०३ शासकीय महाविद्यालये व संस्था, जिल्हा योजना, शासकीय महाविद्यालयाचा विकास तसेच ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, ०१ कार्यालयीन इमारती, ०५१ बांधकामे, जिल्हा योजना,

मोठी बांधकामे, जिल्हा प्रशासन मागणी क्र. ओ - १४ ते ४४ मधून मंजूर करण्यात येतो. "शासकीय महाविद्यालयांचा विकास" या योजनेसाठी खालील प्रमाणे मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**खरेदी :-**

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत येत असलेल्या संस्था / महाविद्यालये यामध्ये विविध विभागाच्या प्रयोगशाळा आहेत. या प्रयोगशाळांमध्ये विद्यार्थ्यांना प्रात्याक्षिकांसाठी विविध प्रकारची उपकरणे व साधनसामुग्रीची आवश्यकता असते. विद्यार्थ्यांना प्रयोगशाळांमध्ये बदलत्या अभ्यासक्रमानूसार आवश्यक असणारी उपकरणे व साधनसामुग्री, प्रयोगशाळा फर्निचर, खेळाचे साहित्य, स्वच्छ पाणी पुरवठा करण्यासाठी विविध उपकरणाची आवश्यकता असते. सदरहू उपकरणे व साधनसामुग्री खरेदीसाठी जिल्हा नियोजन समिती कडे निधी प्रस्तावित करण्यात यावा.

**बांधकामे :-**

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत शासकीय कला महाविद्यालये, विज्ञान संस्था, प्रशासकीय सेवापूर्व प्रशिक्षण संस्था, न्यायसहायक विज्ञान संस्था, अध्यापक महाविद्यालये, शासकीय वाणिज्य महाविद्यालये कार्यरत आहेत. या संस्थामधील विद्यार्थ्यांना शैक्षणिक व पायाभुत सुविधा उपलब्ध होण्याच्या अनुषंगाने सर्व संस्था स्वत:च्या इमारती मध्ये कार्यान्वित असणे आवश्यक आहे. या अनुषंगाने नवीन इमारती तसेच आस्तित्वात असलेल्या इमारतीचे विस्तारीकरण, क्रिडांगण विकास, इमारत बाहय सुशोभिकरण, आवार भिंत बांधकाम इ. साठी जिल्हा नियोजन समितीकडे निधी प्रस्तावित करण्यात यावा.

जिल्हा नियोजन समिती कडून जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण योजना) अंतर्गत "शासकीय महाविद्यालयांचा विकास" या योजनेमध्ये खालील विवरणपत्रात नमूद केलेल्या महाविद्यालये / संस्था यांचा समावेश आहे.

| अ. क्र. | जिल्हा | महाविद्यालये / संस्था यांची नावे |
|---|---|---|
| १. | मुंबई | १.शासकीय अध्यापक महाविद्यालय, मुंबई. २. राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई. ३.सिडनहॅम महाविद्यालय, मुंबई. ४. सिडनहॅम संस्था, मुंबई. ५. शासकीय विधी महाविद्यालय, मुंबई. ६. इस्माईल युसूफ महाविद्यालय, मुंबई. ७.एलफिन्स्टन महाविद्यालय, मुंबई. ८. शासकीय विज्ञान संस्था, मुंबई. ९. शासकीय न्यायसहाय्यक विज्ञान संस्था, मुंबई. |
| २. | रत्नागिरी | १. शासकीय अध्यापक महाविद्यालय, रत्नागिरी. |
| ३. | पनवेल | १. शासकीय अध्यापक महाविद्यालय, पनवेल. |
| ४. | कोल्हापूर | १.शासकीय अध्यापक महाविद्यालय, कोल्हापूर. २. भारतीय प्रशासकीय सेवापुर्व प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर. ३. राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर. |
| ५. | औरंगाबाद | १.शासकीय अध्यापक महाविद्यालय, औरंगाबाद. २. भारतीय प्रशासकीय सेवापुर्व प्रशिक्षण केंद्र, औरंगाबाद. ३. शासकीय ज्ञान विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद. ४. शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद. ५. शासकीय न्यायसहाय्यक विज्ञान संस्था, औरंगाबाद. |

| अ. क्र. | जिल्हा | महाविद्यालये / संस्था यांची नावे |
|---|---|---|
| ६. | परभणी | १. शासकीय अध्यापक महाविद्यालय, परभणी. |
| ७. | बीड | १. शासकीय अध्यापक महाविद्यालय, बीड. |
| ८. | बुलढाणा | १. शासकीय अध्यापक महाविद्यालय, बुलढाणा. |
| ९. | यवतमाळ | १. शासकीय अध्यापक महाविद्यालय, यवतमाळ. |
| १०. | अकोला | १. शासकीय अध्यापक महाविद्यालय, अकोला. |
| ११. | नांदेड | १. शासकीय अध्यापक महाविद्यालय, नांदेड. |
| १२. | भंडारा | १. शासकीय अध्यापक महाविद्यालय, भंडारा. |
| १३. | नागपूर | १. शासकीय न्यायसहाय्यक विज्ञान संस्था, नागपूर. २. भारतीय प्रशासकीय सेवापुर्व प्रशिक्षण केंद्र, नागपूर. ३. वसंतराव नाईक संस्था, नागपूर. ४. शासकीय विज्ञान संस्था, नागपूर. |
| १४. | नाशिक | १. भारतीय प्रशासकीय सेवापुर्व प्रशिक्षण केंद्र, नाशिक. |
| १५. | अमरावती | १. भारतीय प्रशासकीय सेवापुर्व प्रशिक्षण केंद्र, अमरावती. २. शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती. |
| १६. | गडचिरोली | १. शासकीय विज्ञान महाविद्यालय, गडचिरोली. |

उपरोक्त बांधकामे तसेच उपकरणे, साधनसामुग्री खरेदीसाठी खालील उद्दिष्टाखाली तरतुदीची मागणी जिल्हा नियोजन समितीकडे करण्यात यावी.

| अ. क्र. | लेखाशीर्ष | उद्दिष्ट | बांधकामे व खरेदीबाबत तपशील |
|---|---|---|---|
| १. | २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०३ विद्यापीठ व उच्च शिक्षण, १०३ शासकीय महाविद्यालय व संस्था, जिल्हा योजना, शासकीय महाविद्यालयांचा विकास, १३ कार्यालयीन खर्च, ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री, २१ पुरवठा व सामुग्री , २७ लहान बांधकामे. | १३ कार्यालयीन खर्च | शासकीय महाविद्यालय / संस्थांसाठी आवश्यक असणारी उपकरणे व साधनसामुग्री, ग्रंथालयासाठी नवीन संदर्भ ग्रंथ व पुस्तके. |
| २. | | ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री | प्रयोगशाळा उपकरणे व साधनसामुग्री. |
| ३. | | २१ पुरवठा व सामुग्री | प्रयोगशाळांमध्ये आवश्यक असणारी उपभोग्य साधनसामुग्री व सामान. |
| ४. | | २७. लहान बांधकामे | शासकीय महाविद्यालय / संस्था यांच्या इमारतीचे बाहय सुशोभिकरण, इमारत दुरूस्ती, क्रिडांगण, पायाभुत सुविधा, पिण्याचे पाणी व्यवस्था, प्रसाधनगृह बांधणे, वृक्षारोपण, झाडाचे संगोपन, परिसर विकासाची कामे, सोलर उपकरणे, व्हर्चुअल क्लासरूमची निर्मिती. |

| अ. क्र. | लेखाशीर्ष | उद्दिष्ट | बांधकामे व खरेदीबाबत तपशील |
|---|---|---|---|
| ५. | ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, ०१ कार्यालयीन इमारती, ०५१ बांधकामे, जिल्हा योजना, मोठी बांधकामे, जिल्हा प्रशासन - ५३. मोठी बांधकामे. | ५३. बांधकामे | शासकीय महाविद्यालय / संस्था यासाठी नवीन इमारत बांधकाम, आस्तिवात असलेल्या इमारतीचे विस्तारीकरण / नुतनीकरण, नवीन प्रयोगशाळा इमारत बांधकाम. |

या योजनेमध्ये महसूली व भांडवली खर्च होणार आहे. त्यांचे लेखाशीर्ष खालील प्रमाणे आहे.
**महसूली खर्च लेखाशिर्ष :** २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०३ विद्यापीठ व उच्च शिक्षण, १०३ शासकीय महाविद्यालय व संस्था, जिल्हा योजना, शासकीय महाविद्यालयांचा विकास - १३ कार्यालयीन खर्च, ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री, २१ पुरवठा व सामुग्री, २७ लहान बांधकामे.
**भांडवली खर्च लेखाशिर्ष :** ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, ०१ कार्यालयीन इमारती, ०५१ बांधकामे, जिल्हा योजना, मोठी बांधकामे, जिल्हा प्रशासन - ५३. मोठी बांधकामे.

जिल्हा नियोजन समितीकडील ‘शासकीय महाविद्यालयांचा विकास’ या योजनेच्या अंमलबजावणीबाबत खालीलप्रमाणे मागदर्शक सूचना, निकष विहित करण्यात येत आहेत.

१. उच्च शिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत असलेल्या संस्था/ महाविद्यालये यांनी जिल्हा वार्षिक योजनेतून निधी उपलब्धतेबाबत संबधित जिल्हा नियोजन समितीकडे विहित वेळेत तरतुदीची मागणी करावी. यामध्ये अपुर्ण बांधकामे, प्रयोगशाळा उपकरणे व साधनसामुग्री या बाबींना प्राधान्य देण्यात यावे.
२. जिल्हा वार्षिक योजनेतून मंजूर केलेल्या निधीतून करावयाची विकासकामे तसेच उपकरणे व साधनसामुग्री खरेदी प्रस्ताव प्रशासकीय मंजूरीस्तव संबधित जिल्हा नियोजन समितीकडे सादर करावेत. संदर्भ क्र.१ नूसार प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित जिल्हाधिकारी यांना आहेत.
३. संदर्भ क्र.१ शासन निर्णयानुसार तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागाच्या कार्यान्वयीन यंत्रणेस आहेत. त्यानुसार संचालक उच्च शिक्षण, पुणे हे तांत्रिक मान्यता प्रदान करतील.
४. जिल्हा नियोजन समितीच्या निधीतून करावयाची विकासकामे तसेच उपकरणे व साधनसामुग्रीची खरेदी ही विद्यार्थ्याच्या अभ्यासक्रमास पुरक असतील.
५. सार्वजनिक बांधकाम विभागाकडील आराखडा व अंदाजपत्रके घेवून बांधकामे प्रस्तावित करण्यात यावीत.

६. उद्योग, उर्जा, व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र. भखस २०१४/ प्र. क्र. ८२ / भाग -३ उद्योग-४, दि. ३० ऑक्टोबर, २०१५ अन्वये विहित केलेल्या नियमानुसार खरेदी प्रक्रीया राबविण्यात यावी.

७. राज्य योजनेतून निधी उपलब्ध होत असलेल्या योजनांसाठी जिल्हा वार्षिक योजनेतून निधीची मागणी करण्यात येवू नये. एका योजनेसाठी दोन योजनांमधून निधीची मागणी करु नये.

८. या योजनेत सार्वजनिक हिताचीच कामे प्रस्तावित करण्यात यावीत.

९. जिल्हा वार्षिक योजनेतून बांधकामे व खरेदी करताना त्या साठी शासनाने ठरवून दिलेले सर्व नियम, निकष पध्दती व शासनाचे वेळोवेळी होणारे बदल कार्यान्वित अभिकरणावर बधंनकारक राहतील.

१०. या योजनेतील बांधकामे २ वर्षाच्या कालावधीत पूर्ण करण्यात यावीत. त्या अनुषंगाने कामाचे नियोजन व निधीची तरतुद करण्यात यावी.

११. या योजनेवर होणाऱ्या खर्चाचा हिशेब स्वंतत्रपणे ठेवण्यात यावा. योजनेकरीता वितरीत करण्यात आलेला निधी या योजनेच्या अतंर्गत विहित केलेल्या प्रयोजनासाठीच खर्च करण्यात यावा.

१२. अपूर्ण कामाची कामनिहाय माहिती व शिल्लक असलेल्या निधीची सविस्तर माहिती संबधित जिल्हा नियोजन समितीकडे कार्यान्वयीन कार्यालयाने सादर करावी. अपूर्ण कामे प्राधान्याने पूर्ण करण्यात यावीत.

१३. ग्रंथ / पुस्तके खरेदी करताना त्यासंबधीच्या नेहमीच्या कार्यपध्दतीविषयक नियमांचे व सर्वसाधारण निर्देशांचे पालन करण्यात यावे.

१४. सर्व साधारण जिल्हा वार्षिक योजनांच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र काम पूर्ण झाल्याबरोबर काम पूर्णत्वाचे दाखले, खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इ. बाबतची माहिती जिल्हा नियोजन समिती तसेच संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेकडे सादर करण्यात यावी.

१५. या योजनेत समाविष्ट असलेली कामे अन्य कोणत्याही योजनेतून घेण्यात आलेली नाहीत. याची खात्री करण्यात यावी. कामाची पुनरावृत्ती होणार नाही यांची दक्षता घ्यावी.

१६. या योजनेतील खर्च संबधित जिल्हा नियोजन समितीने विहित केलेल्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

१७. शासकीय महाविद्यालये / संस्था यांचे आहरण व संवितरण अधिकारी हे जिल्हा नियोजन समिती कडील योजनांचे काम पाहतील. तसेच संचालक, उच्च शिक्षण, पुणे हे नियंत्रक अधिकारी राहतील.

१८. जिल्हा स्तरीय योजनांचे मासिक खर्चाचे अहवाल दरमहा ५ तारखेपर्यत संबधित जिल्हा नियोजन समिती तसेच संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांना सादर करावेत.

१९. जिल्हास्तरीय कार्यकारी यंत्रणेने या विभागास तसेच नियोजन विभागास प्रशासकीय मान्यता, मंजूर निधी, प्रत्यक्ष खर्च, भौतिक साध्य याबाबतची माहिती सादर करतील.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.५६/१४८१, दि. ०७.०९.२०१६ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ७५६/व्यय -५, दि. १५.१२.२०१६ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२९१२२४०९३६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Vasantrao Kharke

Digitally signed by Dattatray Vasantrao Kharke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6baef55ad6f77a3a40cccc3e9dd0f50e344ab83a754542299875cf07868ed88b, cn=Dattatray Vasantrao Kharke
Date: 2016.12.30 15:11:15 +05'30'

**( द. व. खारके )**

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक, उच्च शिक्षण महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. संबधित जिल्हाधिकारी तथा सचिव,जिल्हा नियोजन समिती.
३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिपत्याखालील सर्व संस्था/महाविद्यालये.
४. सर्व विभागीय, सहसंचालक, उच्च शिक्षण.
५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. अवर सचिव, साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती मशि-३.